**सन २०१९-२० करीता राज्यातील तालुका क्रीडा संकुलाकरीता अनुदान वितरणास मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः क्रीडायो-२६१९/प्र.क्र. १०३/क्रीयुसे-१,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २६ मार्च, २०२०.

वाचा :-

१) शासन निर्णय, सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग, क्र.राक्रीधो २००३/प्र.क्र.११/क्रीयुसे-१, दिनांक २६ मार्च, २००३.
२) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र.राक्रीधो २००९/(प्र.क्र.२५/०९)/ क्रीयुसे-१, दिनांक २१ मार्च, २००९.
३) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र. क्रीडायो-२६१९/ प्र.क. १०३/ क्रीयुसे-१, दि. २०/९/२०१९
४) शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक ८ जुलै, २०१९ व दि. २२ जानेवारी, २०२०
५) उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांचे पत्र क्र. क्रीसंता/पुमा/निमा/का-९/३७३६, दि. २३/१/२०२०.
६) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक अर्थस-२०१९/ प्र.क्र. ९२/अर्थ-३, दिनांक १३ मार्च, २०२०

**प्रस्तावना :-**

राज्याचे क्रीडा धोरण २००१ अंतर्गत तालुका स्तरावर तालुका क्रीडा संकुलामध्ये विविध खेळाच्या किमान सुविधा उपलब्ध करुन देणे, जिल्हा स्तरावर जिल्हा क्रीडा संकुलांतर्गत राष्ट्रीय दर्जाच्या क्रीडा सुविधा उपलब्ध करुन देणे, त्याचप्रमाणे विभागीय स्तरावर विभागीय क्रीडा संकुलांतर्गत आंतरराष्ट्रीय दर्जाच्या क्रीडा सुविधा उभारणे याबाबतची योजना संदर्भ क्र. (१) येथील दिनांक २६ मार्च, २००३ च्या शासन निर्णयान्वये कार्यान्वित करण्यात आली आहे. संदर्भ क्र. (२) येथिल दिनांक २१ मार्च, २००९ च्या शासन निर्णयानुसार तालुका क्रीडा संकुलाची अनुदान मर्यादा रु.२५.०० लक्षवरुन रु.१.०० कोटी, जिल्हा क्रीडा संकुलाची अनुदान मर्यादा रु.४.०० कोटीवरुन रु.८.०० कोटी व विभागीय क्रीडा संकुलाची अनुदान मर्यादा रु.१६.०० कोटीवरुन रु.२४.०० कोटी इतकी करण्यात आली आहे.

२. दिनांक २६.०३.२००३ च्या शासन निर्णयान्वये राज्य क्रीडा विकास समितीची स्थापना करण्यात आली आहे. विभागीय/जिल्हा/तालुका क्रीडा संकुलातील विविध क्रीडा सुविधांसाठी तांत्रिक, प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याचे अधिकार या समितीस आहेत.

राज्य क्रीडा विकास समितीच्या बैठकीतील निर्णयानुसार, क्रीडा व युवक सेवा संचालनालयाच्या १)दिनांक २३.०३.२०१६ च्या पत्रान्वये, कामठी (कोराडी) तालुका क्रीडा संकुलाच्या रु.६१०.७२ लक्ष च्या, २)दिनांक २५.०६.२०१८ च्या पत्रान्वये, बल्लारपूर तालुका क्रीडा संकुलाच्या रु.२८३४.५२ लक्षच्या, ३) दिनांक ३०.०५.२०१८ च्या पत्रान्वये चंद्रपूर जिल्हयातील तालुका क्रीडा संकुल, मुल, बल्लारपूर, पोंभूर्णा व चिमूर च्या विद्युतीकरणाच्या अंदाजपत्रक व आराखडयांना ४) दिनांक २/४/२०१९ च्या पत्रान्वये तालुका क्रीडा संकूल, साकोली च्या रु. २०४.६२ लक्ष व लाखनी (जि. भंडारा) येथील तालुका क्रीडा संकुलाच्या रु. १९०.९१ लक्ष

किंमतीच्या अंदाजपत्रकास ५) दिनांक २/४/२०१९ च्या पत्रान्वये, तालुका क्रीडा संकूल, परतूर व मंठा (जि. जालना ) च्या प्रत्येकी रु. १५००.०० लक्ष इतक्या किमतीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय व तांत्रिक मान्यता प्रदान केली आहे

संदर्भ क्र. ३ येथील दि. २०/९/२०२० च्या शासन निर्णयान्वये, सन २०१९-२० करीता उपलब्ध तरतूदीतून ८ तालुका क्रीडा संकुलाकरीता रु. ७२१.४९ लक्ष इतका निधी वितरीत करण्यात आला आहे. क्रीडा व युवक संचालनालयाच्या संदर्भाधीन क्र.५ येथील दि. २३/१/२०२० च्या पत्रान्वये तालुका क्रीडा संकुल, कामठी (जि. नागपूर), लाखनी (जि. भंडारा), साकोली (जि. भंडारा), मंठा (जि. जालना), परतूर (जि. जालना) साठी लेखाशिर्ष २२०४ १७९२ खाली उपलब्ध तरतूद वितरीत करण्याची विनंती करण्यात आली आहे. या अनुषंगाने सदरहू तालुका क्रीडा संकुलांसाठी सन २०१९-२० या आर्थिक वर्षामध्ये अर्थसंकल्पित करण्यात आलेली तरतूद वितरीत करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

क्रीडा प्रशिक्षण केंद्राची आस्थापना या कार्यक्रमांतर्गत योजनेकरीता सन २०१९-२० या वर्षाकरिता अर्थसंकल्पीत केलेल्या तरतूदीपैकी रु. ३२१.०० लक्ष (रुपये तीन कोटी एकवीस लाख फक्त) इतकी तरतूद ५ तालुका क्रीडा संकुलांच्या बांधकामाकरिता सोबतच्या **परिशिष्ट “अ”** मध्ये दर्शविल्यानुसार वितरीत करण्यास व आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या अधिनस्त ठेवण्यास शासन या आदेशाद्वारे मान्यता देत आहे. सदरचा निधी ज्या प्रयोजनाकरिता / बाबींकरिता मंजूर केला आहे. त्याच बाबींकरिता खर्च करण्यात यावा.

२. सन २०१९-२० मध्ये क्रीडा प्रशिक्षण केंद्राची आस्थापना याकरीता उपलब्ध झालेल्या तरतुदी मधून सदर निधी वितरीत करण्यात यावा.

I. उपरोक्त निधी आवश्यकतेनुसार मान्य निकषानुसार खर्च करण्यात यावा. ज्यावेळेस निधी प्रत्यक्ष खर्च करावयाचा त्याच वेळी आंहरीत करावा. तसेच जेवढया रकमेची देयके प्राप्त झालेली आहेत, तेवढाचा खर्च करण्यात यावा. शासन लेख्याबाहेर बँक खात्यात हा निधी ठेऊ नये.

II. राज्य शासनामार्फत वेळोवेळी वित्त विषयक निर्गमित करण्यात आलेले विविध आदेश/नियम/ शासन निर्णय वित्तीय नियमावली यांची अंमलबजावणी करुन वरील वितरीत तरतूदीचा विनियोग करण्याच्या अधीन राहून उपरोक्त तरतूद वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. उपरोक्त संदर्भात होणारा खर्च मागणी क्रमांक ई-३, प्रधान लेखाशीर्ष २२०४, क्रीडा व युवक सेवा, १०४, क्रीडा व खेळ, (१०) (०२) क्रीडा प्रशिक्षण केंद्राची आस्थापना, (२२०४ १७९२), ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशीर्षाखालील या वर्षाच्या उपलब्ध तरतूदीतून करण्यात यावा.

४. वित्त विभाग दिनांक ८/७/२०१९, २२/१/२०२० व ११/३/२०२० च्या परिपत्रकातील सूचनानुसार उपरोक्त तरतुद खर्च करण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी. यासाठी संबंधित जिल्हा क्रीडा अधिकारी यांना

आहंरण व संवितरण अधिकारी व आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ७२/१४७१, दिनांक २०/२/२०२० व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. १७६/२०/व्यय-५, दिनांक २६/२/२०२० च्या अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३२६१५३०४१६८२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Swati Madhukar Nanal

Digitally signed by Swati Madhukar Nanal
DN: CN = Swati Madhukar Nanal, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = School Education and Sports Department
Date: 2020.03.26 15:35:05 +05'30'

**( स्वा. म. नानल )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे स्वीय सहायक, मुंबई.
२. मा.मंत्री, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३. मा.विरोधी पक्षनेता (विधानसभा / विधानपरिषद) यांचे स्वीय सहायक, मुंबई.
४. सर्व विधानसभा / विधानपरिषद सदस्य यांचे स्वीय सहायक.
५. अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
६. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे,
७. सर्व जिल्हाधिकारी (क्रीडा संचालनालयामार्फत)
८. सर्व उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा (क्रीडा संचालनालयामार्फत)
९. महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर,
१०. महालेखापाल (लेखा), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर
११. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई. (क्रीडा संचालनालयामार्फत)
१२. सर्व संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी ( क्रीडा संचालनालयामार्फत)
१३. वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे. ( क्रीडा संचालनालयामार्फत)
१४. सर्व जिल्हा क्रीडा अधिकारी ( क्रीडा संचालनालयामार्फत)
१५. वित्त विभाग (व्यय-५)/अर्थ-८/नियोजन विभाग (का.१४७१), मंत्रालय, मुंबई,
१६. कार्यासन अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१७. निवड नस्ती (क्रीयुसे-१).

## परिशिष्ट-अ

शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र. पुमाप्र-२६१९/ प्र.क्र. १०३/ क्रीयुसे-१,
दिनांक : २६ मार्च, २०२० चे जोडपत्र

| अ.क्र. | जिल्हा | अ.क्र. | तालुका क्रीडा संकुल | निधी वितरण (रु.लाखात) |
|---|---|---|---|---|
| १ | नागपूर | १ | कामठी (कोराडी) | २१.०० |
| २ | भंडारा | २ | लाखनी | ५०.०० |
| | | ३ | साकोली | ५०.०० |
| ३ | जालना | ४ | मंठा | १००.०० |
| | | ५ | परतूर | १००.०० |
| | | | | |
| | | | **एकुण** | **३२१.००** |

**(एकूण रूपये तीन कोटी एकवीस लाख फक्त)**

Swati Madhukar Nanal

Digitally signed by Swati Madhukar Nanal
DN: CN = Swati Madhukar Nanal, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = School Education and Sports Department
Date: 2020.03.26 15:35:22 +05'30'

**( स्वा. म. नानल )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**